श्रीक्षेत्र राजूर गणपती मंदिर, राजूर, ता. भोकरदन, जि. जालना या तीर्थक्षेत्राच्या विकास आराखडयांतील कामांना निधी वितरीत करणेबाबत.

महाराष्ट्र शासन
ग्राम विकास विभाग
शासन निर्णय क्रमांक: तिर्थवि-२०२१/प्र.क्र.१५७(भाग-१)/यो-६
बांधकाम भवन, २५ मर्झबान पथ
फोर्ट, मुंबई ४०० ००१
दिनांक : २३ मार्च, २०२३

वाचा:-

१) जिल्हाधिकारी, जालना यांचे पत्र क्र.जिनिस/जा/पर्यटन/तीर्थक्षेत्र/२०१७-१८/२६५, दि.१७/०२/२०१८.
२) मा. मुख्य सचिव यांचे अध्यक्षतेखालील उच्चाधिकार समितीचे दि.२३ फेब्रुवारी, २०१८ रोजी झालेल्या बैठकीचे इतिवृत्त
३) मा. मुख्यमंत्री महोदय यांचे अध्यक्षतेखालील राज्यस्तरीय समितीचे दि.२१ ऑगस्ट, २०१८ रोजी झालेल्या बैठकीचे इतिवृत्त
४) शासन निर्णय क्रमांकः तिर्थवि-२०१८/प्र.क्र.२०९/योजना-६, ग्राम विकास विभाग, दि. १४ फेब्रुवारी, २०१९.
५) शासन निर्णय क्रमांकः तिर्थवि-२०१९/प्र.क्र.११८/योजना-६, ग्राम विकास विभाग, दि. ३१ जुलै, २०१९.
६) शासन निर्णय क्रमांकः तिर्थवि-२०२१/प्र.क्र.१०४/योजना-६, ग्राम विकास विभाग, दि. ३० मार्च, २०२१.
७) ग्राम विकास विभाग शासन निर्णय क्रमांकः तिर्थवि-२०२१/प्र.क्र.१५७(भाग-१)/योजना-६, दि. ०१ डिसेंबर, २०२२.
८) जिल्हा नियोजन अधिकारी, जालना यांचे पत्र जा.क्र.जिनिस/पर्यटन/२०२२-२३/२७०, दि.२१ फेब्रुवारी, २०२३.

प्रस्तावना :-

संदर्भाधीन शासन निर्णय क्र. ०४ अन्वये श्रीक्षेत्र राजूर गणपती मंदिर, राजूर, ता. भोकरदन, जि.जालना या तीर्थक्षेत्राच्या रु. २३, ९६,२४, ७१०/- (रुपये तेवीस कोटी शह्यानऊ लाख चोवीस हजार सातशे दहा फक्त) इतक्या रकमेच्या विकास आराखडयास प्रशासकीय मान्यता देण्यात आली होती. तसेच, संदर्भिय शासननिर्णय क्र. ०५ अन्वये प्रथम टप्प्यात रु.४,८०,००,०००/-(रुपये चार कोटी ऐंशी लाख फक्त) इतका निधी जिल्हाधिकारी, जालना यांना वितरीत करण्यात आला होता. संदर्भिय शासननिर्णय क्र. ०६ अन्वये दुसऱ्या टप्प्यात रु. ७,४५,०६, ००० /- (रुपये सात कोटी पंचेचाळीस लाख पन्नास हजार फक्त) इतका निधी जिल्हाधिकारी, जालना यांना वितरीत करण्यात आला होता. संदर्भिय शासननिर्णय क्र. ०७ अन्वये तिसऱ्या टप्प्यात रु. ५,८५,५०,००० /- (रुपये पाच कोटी पंच्याऐंशी लाख सहा हजार फक्त) असा आतापर्यंत एकूण रु.१८,१०,५६,०००/- (रुपये अठरा कोटी दहा लाख छप्पन्न हजार फक्त) इतका निधी

जिल्हाधिकारी, जालना यांना वितरीत करण्यात आला होता. जिल्हाधिकारी, जालना यांच्या दि.२१/०२/२०२३ रोजीच्या पत्रान्वये निधी वितरणासाठी प्रस्ताव प्राप्त झाला होता. त्यानुसार सदर तीर्थक्षेत्रासाठी उर्वरित निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

**"ग्रामीण तीर्थक्षेत्र विकास योजनेअंतर्गत राज्यातील ग्रामीण तीर्थक्षेत्रांना निधी वितरीत करण्यासाठी सन २०२२-२३ या आर्थिक वर्षात एकूण रु.२२५००.०० लक्ष इतका निधी अर्थसंकल्पीत करण्यात आला आहे. सदर तरतूदीतून उपलब्ध निधीच्या मर्यादेत श्रीक्षेत्र राजूर गणपती मंदिर, राजूर, ता.भोकरदन, जि.जालना या तीर्थक्षेत्रातील विकास कामांसाठी उर्वरित रु. ५,८५,५०,०००/- इतका निधी जिल्हाधिकारी, जालना यांना वितरीत करण्यात येत आहे".**

०२. सदर अर्थसंकल्पीत निधीतून श्रीक्षेत्र राजूर गणपती मंदिर, राजूर, ता. भोकरदन, जि. जालना येथे करावयाच्या विकास कामांकरीता उर्वरित रु. ५,८५,५०,०००/-(रुपये पाच कोटी पंच्याऐंशी लाख पन्नास हजार फक्त) इतका निधी जिल्हाधिकारी, जालना यांच्या अधिनस्त ठेवण्यात येत आहे.

०३. जिल्हाधिकारी, जालना यांनी प्रशासकीय मान्यता दिलेल्या कामावरच सदर निधी खर्च करावा. तसेच संदर्भाधीन शासन निर्णय क्र. ४ मधील मंजूर कामे पूर्ण करण्याकरिता शासन उक्त निधी वितरीत करीत आहे. सबब, सदर निधी संबधित कार्यान्वयिन यंत्रणेला वितरीत करताना व प्रत्यक्ष खर्च करताना तसेच सदर कामे पूर्ण करताना उपरोक्त संदर्भाधीन शासन निर्णय क्र. ४ मध्ये नमूद अटी-शर्ती व त्यामध्ये दिलेले संबधित निदेश व प्रचलित नियम लागू राहतील.

०४. सदर कामांच्या अंदाजपत्रकास सक्षम प्राधिकाऱ्यांची तांत्रिक मंजूरी असल्याची व बांधकामासाठी आवश्यक जागा ग्रामपंचायत/जिल्हा परिषद मालकीची आहे, याची जिल्हाधिकारी यांच्या अध्यक्षतेखालील कार्यकारी समितीने खात्री करून पुढील कार्यवाही करावी.

०५. मंजूर निधीचा योग्य विनियोग होण्यासाठी व कोणत्याही प्रकारची अनियमितता होणार नाही या दृष्टीने जिल्हाधिकारी, जालना यांनी दक्षता घ्यावी. सदर कामांचा त्यांनी वेळोवेळी आढावा घेऊन कामावर देखरेख ठेवावी व कामांचा भौतिक प्रगती अहवाल व खर्चाची माहिती विहित मुदतीत सादर करावी. तसेच, जिल्हाधिकारी, जालना यांनी या योजनेकरिता झालेल्या/होणाऱ्या खर्चाचा आढावा घेऊन महालेखापाल कार्यालयातील खर्चाचा ताळमेळ घेऊन त्यामध्ये तफावत राहणार नाही, याबाबत दक्षता घ्यावी व सदर निधी आवश्यक बाबींवर खर्च झाला असल्याचे उपयोगिता प्रमाणपत्र शासनास व महालेखापाल कार्यालयास सादर करावे.

०६. राज्य शासनामार्फत वेळावेळी प्रस्तुत योजनेविषयी व वित्त विषयक वेळोवेळी निर्गमित करण्यात आलेले आदेश/नियम/शासननिर्णय/वित्तीय नियमावली यांची अंमलबजावणी करून वरील वितरीत तरतूदीचा विनियोग करण्याच्या अधीन राहून उपरोक्त तरतूद वितरीत करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

०७. सदर कामांचे नियोजन व खर्चाचे सनियंत्रण, नियोजन विभाग, शासन निर्णय क्रमांक तीक्षेवि-२०१५/प्र.क.६/१४४४, दिनांक ४ जुन २०१५ अन्वये गठीत करण्यात आलेल्या जिल्हाधिकारी यांच्या अध्यक्षतेखालील जिल्हा़स्तरीय कार्यकारी समितीकडे सोपविण्यात येत आहे. समितीची कार्यकक्षा शासन निर्णयात नमूद केल्यानुसार राहिल.

०८. याबाबत प्राप्त होणाऱ्या निधीकरिता जिल्हा नियोजन अधिकारी/ सहाय्यक जिल्हा नियोजन अधिकारी, जालना यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. तसेच जिल्हाधिकारी, जालना यांना नियंत्रक अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

०९. त्याचप्रमाणे सर्व संबधितांचे लक्ष या विभागाच्या शासन निर्णय दि.१६/११/२०१२ कडे वेधण्यात येत असून पशूहत्त्या व अंधश्रद्धा वाढीला प्रोत्साहन देणाऱ्या तीर्थक्षेत्रांना निधी वितरीत केला जाणार नाही. सबब, संबधित तीर्थक्षेत्रस्थानी असे प्रकार शासनाच्या निदर्शनास आल्यास योग्य ती कार्यवाही केली जाईल व शासकीय अनुदान थांबविले जाईल.

१०. जिल्हास्तरीय कार्यकारी समितीने कामांच्या अंमलबजावणीसाठी संबंधीत कार्यान्वयीन यंत्रणांशी समन्वय साधावा व कामे विहीत कालावधीत पूर्ण होण्यासाठी आवश्यक त्या उपाययोजना कराव्यात.

११. उपरोक्त कामांवरील खर्च मागणी क्र.एल-०३ "२५१५-इतर ग्रामविकास कार्यक्रम-१९६, जिल्हापरिषदांना / जिल्हास्तरीय पंचायतीना सहाय्य-(००)(०७) ग्रामीण भागातील तीर्थक्षेत्रांच्या विकासाकरीता रु.२.०० ते २५.०० कोटीपर्यंत अनुदान (२५१५ २५२१) (योजनांतर्गत) दत्तमत ३१-सहाय्यक अनुदाने या लेखाशिर्षाखाली सन २०२२-२३ या आर्थिक वर्षाच्या मंजूर तरतूदीतून भागविण्यात यावा.

१२. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या शासन परिपत्रक क्र: अर्थसं-२०२२/प्र.क्र.४३/अर्थ-३ दि.०४ एप्रिल, २०२२ अन्वये अटीची व शर्तीची पुर्तता करून निर्गमित करण्यात येत आहे.

१३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०३२११५३१४१९२२० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.**

KALU GONYA VALVI

Digitally signed by KALU GONYA VALVI
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=COOPERATION MARKETING AND TEXTILE DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra,
2.5.4.20=714701fc3db9c38a46f4cd82e1e450b51a9e92eede8c323934f82edb538d3b20, pseudonym=C66B420751C8769D652257224AF3DC28B2BA4FF1, serialNumber=8C5D0F275C3D9A21DB07FECF7919C2D83796E88930D62D44E7A4A6D4CBEE7E0E,
cn=KALU GONYA VALVI
Date: 2023.03.24 11:27:52 +05'30'

**( का.गो.वळवी )**
**उप सचिव , महाराष्ट्र शासन.**

प्रति,

१. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मुख्यमंत्री यांचे कार्यालय, मंत्रालय, मुंबई
२. मा. उपमुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, उप मुख्यमंत्री यांचे कार्यालय, मंत्रालय, मुंबई

३. मा.मंत्री (ग्रा.वि.) यांचे खाजगी सचिव.
४. मा.राज्यमंत्री (ग्रा.वि.).यांचे खाजगी सचिव.
५. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र-१, मुंबई / महाराष्ट्र-२ नागपूर
६. महालेखापाल (लेखा परीक्षा) महाराष्ट्र-१, मुंबई / महाराष्ट्र-२ नागपूर
७. मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मुंबई
८. अपर मुख्य सचिव, ग्राम विकास विभाग, बांधकाम भवन, मंबई.
९. अपर मुख्य सचिव (वित्त), मंत्रालय, मुंबई.
१०. अपर मुख्य सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
११. अपर मुख्य सचिव (बांधकाम), सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई.
१२. प्रधान सचिव (पर्यटन), पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई.
१३. विभागीय आयुक्त, आयुक्त कार्यालय, औरंगाबाद.
१४. जिल्हाधिकारी, जिल्हाधिकारी कार्यालय, जालना.
१५. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, जालना.
१६. मुख्य लेखा व वित्त अधिकारी, जिल्हा परिषद , जालना.
१७. अधिक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, जालना.
१८. जिल्हा कोषागार अधिकारी, जालना.
१९. नियोजन विभाग (का.१४७४/१४४४) मंत्रालय, मुंबई-३२.
२०. वित्त विभाग (व्यय -१५, अर्थसंकल्प-१६/१७), मंत्रालय, मुंबई ३२.
२१. कक्ष अधिकारी, कार्यासन क्र.वित्त-७, वित्त-१, वित्त-८, ग्राम विकास विभाग
२२. निवड नस्ती (का.यो-६). ग्राम विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.